कुटुंब कल्याण कार्यक्रमांतर्गत मंजूर १९० अस्थायी पदांना दि.०१.१०.२०१९ ते दि. २९.०२.२०२० तसेच दि.०१.०३.२०२० ते दि. ३१.०८.२०२० या कालावधी करीता मुदत वाढ देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः अस्थायी २०२०/१४/प्र.क्र.३७/ कु.क.

१० वा मजला, बी विंग, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, लो.टि. मार्ग, मुंबई- ४०० ००१
तारीख: २८ फेब्रुवारी, २०२०

वाचा -

१) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्रमांकः अस्थायी -२०१९/प्र.क्र.८५/ कु.क., दि. १५ मार्च, २०१९
२) सह संचालक, आरोग्य सेवा (अ व प्र), मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/ आस्था/ कक्ष ५/टे ५/ १९० अपदे/१७२- ७३/२०, दि. १३/०१/२०२०.
३) वित्त विभाग,शासन निर्णय क्रमांकः पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आपुक, दि.११.०९.२०१९
४) वित्त विभाग,शासन निर्णय क्रमांकः पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आपुक, दि.१२.०२.२०२०

प्रस्तावना -

कुटुंब कल्याण कार्यक्रमांतर्गत विविध योजनांतर्गत कार्यरत असलेल्या १३८४ अस्थायी पदांना दि. १५/०३/२०१९ च्या शासन निर्णयान्वये दि.०१/०३/२०१९ ते ३०/०९/२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. सदर १३८४ पदांपैकी आरोग्य केंद्र ११४७ पदे + शहरी कुटुंब कल्याण केंद्र ४७ पदे अशी एकूण ११९४ इतकी पदे नागरी भागातील आरोग्य सेवांची पुनर्रचना अंतर्गत योजनेत येत असल्याने ती वगळण्यात आली आहेत. उर्वरित १९० अस्थायी पदांना पुढील मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र. २ अन्वये शासनास प्राप्त झाला आहे. त्यानुषंगाने १९० अस्थायी पदांना दि. ०१/१०/२०१९ ते दि. २९/०२/२०२० तसेच दि. ०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० पर्यंत पुढे चालु ठेवण्यास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय-

कुटुंब कल्याण कार्यक्रमांतर्गत विविध योजनांच्या अंमलबजावणीकरीता शासकिय संस्थेच्या नागरी आरोग्य केंद्रातील मंजूर असलेल्या १९० अस्थायी पदांना वित्त विभागाच्या दि.११/०९/२०१९ च्या

शासन निर्णयान्वये दि.०१/१०/२०१९ ते दि.२९/०२/२०२० तसेच वित्त विभागाच्या दि.१२.२.२०२० च्य शासन निर्णयान्वये दि.०१.०३.२०२० ते ३१.०८.२०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यांस या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षा करिता सदर पदावरील खर्च खालील विवरणपत्रात दिलेल्या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पीत केलेल्या मंजूर तरतुदींतून भागविण्यात यावा.

| **१९० अस्थायी पदांच्या वेतनावरील खर्च खालील लेखाशिर्षातून भागविण्यात यावा.** | | | |
|---|---|---|---|
| **अ.क्र.** | **योजनेचे नाव** | **पदसंख्या** | **पदांवरील खर्च दर्शविणारे लेखाशीर्ष** |
| **१** | **२** | **३** | **४** |
| १ | नागरी भागातील आरोग्य सेवांची पुनर्रचना | १९० | **शासकीय संस्थेमार्फ़त चालविले जाणारे आरोग्य केंद्र-**<br>मागणी क्रमांक. आर-१, २२११- कुटुंब कल्याण, १०२- नागरी कुटुंब कल्याण सेवा, (०१) नागरी कुटुंब कल्याण सेवा १००टक्के केंद्र पुरस्कृत योजना- (०१) (०१) नागरी कुटुंब कल्याण केंद्र (२२११ ०१७६) |
| **एकूण** | | **१९०** | |

सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक, दि.११/०९/२०१९ तसेच दि.१२.०२.२०२० अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२२७१५०८५४८९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ujwala Arun Ransing

Digitally signed by Ujwala Arun Ransing
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a7788b3b31e2d9269bcbfd9588a6ee4771341780133d295a56dd4ef476977773, serialNumber=3b8f98f1c182bf458a4deee399a7241b5044aeb09c097bc6d28b58709fe8ef0d, cn=Ujwala Arun Ransing
Date: 2020.02.28 17:11:16 +05'30'

**(उज्वला अ. रणसिंग)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल,महाराष्ट्र -१/२ (लेखापरीक्षा/(लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
२. अधिदान व लेखा कोषागार, मुंबई.

३. आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
५. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण, पुणे
६. निवासी लेखाधिकारी, मुंबई
७. सचिव,आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, केंद्र शासन, निमार्ण भवन,नवी, दिल्ली
८. विभागीय संचालक (कु.क.), ८२/२, पर्वती, पहिला माळा, दर्पण बिल्डींग, सहकार नगर, पुणे
९. आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
१०.सह संचालक (अर्थ व प्रशासन ), आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
११.उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ (सर्व)
१२.उप संचालक, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे
१३.जिल्हा शल्य चिकित्सक , सामान्य रूग्णालय (सर्व)
१४.जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१५.वैद्यकीय अधिकारी, केंद्रीय रूग्णालय, उल्हासनगर , जिल्हा- ठाणे
१६.प्राचार्य, नागपूर कॉलेज ऑफ़ होमिओपॅथी व बायोकेमिस्ट्री, ५४३, आश्रमशाळा, लेआऊट , ग्रेटनाग रोड , नागपूर- ४४० ००९.
१७. जिल्हा कोषागार अधिकारी , पुणे
१८. वित्त विभाग(व्यय-१३) मंत्रालय, मुंबई.
१९. निवडनस्ती ( कु.क.).